Convertion in Regular Temparary Establishment:- Shri Dada Mahadev Jadhav working under - Superintending Engineer, Satara Patbandhare Mandal, Satara

कार्यव्ययी व रोजंदारी आस्थापनेवरील पदांचे अस्थायी आस्थापनेवरील पदांमध्ये रुपांतरण-- **श्री. दादा महादेव जाधव,अधिक्षक अभियंता सातारा पाटबंधारे मंडळ, सातारा**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. एसयुटी-२००४/ (११५/२००४)/आ(कामगार)
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २७/४/२०११

**पहावे** :- १)अधीक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा यांचे पत्र जा. क्र. प्रशा - ५ (अ )/१६३१/२०११ दिनाक २४.२.११.
२)शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.रु.अ.आ.१५९६/२२८/सेवा-५, दि.२४.४.२००१.

**प्रस्तावना:**

अधिक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे मंडळ प्रकल्प, सातारा यांच्या नियंत्रणाखालील विभागीय कार्यालय, यांनी श्री. दादा महादेव जाधव यांची दि ८.११.८४ रोजी हंगामी अकुशल कामगार म्हणून नियुक्ती केली होती. दि २६.८.९२ रोजी काम उपलब्ध नसल्यामुळे त्यांना कामावरुन कमी करण्यात आले होते. त्यामुळे त्यांनी सेवेत पुन्हा घेण्यासाठी मा. कामगार न्यायालय, सातारा येथे रेफरन्स आय डी क: १८/९४ दाखल केला. सदर दाव्याचा निर्णय दि १.४.०३ रोजी लागला या निर्णयान्वये कामगारास दि. २५.८.९२ पासून प्रत्यक्ष पुन:स्थापित करेपर्यंतच्या कालावधीतील वेतन व भत्यापोटी ५०% रक्कम थकबाकी देऊन सेवासातत्यासह कामावर हजर करुन घ्यावे, असा निर्णय झाला. सदर निर्णयाविरुध्द मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेली याचिका दि १७.२.०४ रोजी फेटाळली यास अनुलक्षून सदर निर्णयाविरुध्द मा. विधी व न्याय विभागाने मा. सर्वोच्च न्यायालयात अपिल दाखल न करण्याचे दिलेले अभिप्राय विचारात घेऊन श्री. जाधव यांना सेवेत पुन:स्थापित करण्याचा प्रस्ताव मा. सचिव समितीस सादर करण्यात आला होता. सचिव समितीने वरिष्ठ न्यायालयात अपिल दाखल करण्याचे निदेश दिले. त्यानुसार सदर प्रकरणी विधी व न्याय विभागाच्या मान्यतेने मा. सर्वोच्च न्यायालयात एस एल पी दाखल करण्यात आली असता, सदर याचिका दि २६.७.०६ रोजी विलंबाच्या कारणास्तव फेटाळण्यात आली. त्यामुळे मा. कामगार न्यायालयाची अंमलबजावणी करणे अनिवार्य होते. त्यानुसार श्री. जाधव यांना दि २५.८.९२ पासून प्रत्यक्ष पुन:स्थापित करेपर्यंतच्या कालावधीतील वेतन व भत्यापोटी ५०% रक्कम थकबाकी देऊन सेवासातत्यासह कामावर हजर करुन घेण्याबाबतच्या प्रस्तावास दि २१.३.०७ रोजी झालेल्या बैठकीत सचिव समितीने मान्यता दिली. श्री. जाधव यांची नियुक्तीच्या दिनांकापासून म्हणजे दिनांक ८.११.८४ पासून एका वर्षाच्या कालावधीत एकूण २४० दिवस इतकी सेवा झाली आहे. शासन निर्णय दि २४.४.२००१ मधिल तरतुदीनुसार श्री. जाधव यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याचा दिनांक ( ८.११.८९ ) हा दिनांक ३१.१२.९८ पूर्वीचा येतो. यास्तव श्री. दादा जाधव यांना मजूर या पदावर रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

अधिक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे मंडळ, सातारा यांच्या अधिपत्याखालील श्री. दादा महादेव जाधव यांना खालीलप्रमाणे रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घेण्यात येत आहे.

| अ.क्र | कर्मचाऱ्यांचे नाव | आस्थापनेचा प्रकार | प्रथम नियुक्तीचे पद व दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणावयाचा दिनांक | रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर घ्यावयाचे पद | वेतनश्रेणी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. दादा महादेव जाधव | रोजंदारी | मजुर ८.११.८४ | ८.११.८९ | मजूर | रु.७५०-९४० (जुनी) रु.२५५०-३२०० (५ वा वेतन आयोग ) |

२. सर्वश्री. दादा महादेव जाधव यांना रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणल्यामुळे त्यांना पुढील सवलती देण्यात येत आहेत :-

अ) अस्थायी आस्थापनेवर धारण केलेल्या पदांकरिता सेवाप्रवेश नियमानुसार वा अन्य प्रकारे विहित करण्यात आलेली किमान/कमाल वयोमर्यादेची व चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे बाबतीत शैक्षणिक अर्हतेची अट शिथिल करण्यांत येत आहे.

ब) नेमणूक सेवायोजन कार्यालयाच्या शिफारशी व्यतीरिक्त अन्य मार्गाने झालेली असल्यास, सेवायोजन कार्यालयामार्फत भरती करण्याची अट देखिल शिथिल करण्यात येत आहे.

क) स्वास्थ्य प्रमाणपत्र सादर करण्याच्या अटीतून त्यांना सूट देण्यांत येत आहे.

३. अधीक्षक अभियंता, यांनी या आदेशातील सर्व अटी व शर्ती विचारात घेऊन कोणत्याही त्रुटी राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी आणि योग्य ते सविस्तर आदेश या शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत निर्गमित करुन ते संबंधित कर्मचाऱ्याच्या निदर्शनास आणावेत. तपशिलामध्ये संबंधित कर्मचाऱ्यांचे नांव , पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक त्याला रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर ज्या दिनांकापासून आणण्यात आले आहे तो दिनांक यामध्ये कोणतीही चूक वा त्रुटी आढळून आल्यास क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी अशी बाब शासनाच्या निदर्शनास तात्काळ आणावी. क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी सदर आदेशात स्वतःच्या अधिकारात कोणतेही फेरबदल करु नयेत, तसेच हे आदेश संबंधित कर्मचाऱ्याच्या व्यक्तीशः निदर्शनास आणून शासनाने निर्गमित केलेल्या आदेशांच्या बाबतीत संबंधित कर्मचाऱ्याची (नाव, पदनाम, त्याच्या प्रथम नियुक्तीचा दिनांक तसेच रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणण्याच्या दिनांकात दुरुस्ती इ. बाबतीत) कोणतीही तक्रार नसल्यास त्याच्याकडून तशा आशयाचे शासन निर्णय दि. २४.४.२००१ सोबतच्या प्रपत्र 'ब' मधील नमुन्यात हमीपत्र (Undertaking) घेवून ते त्या कर्मचाऱ्यांच्या सेवापटात /सेवापुस्तकात चिकटवून ठेवावे आणि ही सर्व कार्यवाही पूर्ण केल्याचा अनुपालन अहवाल या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याबाबतीत संबंधीत अधीक्षक अभियंत्यांनी सतर्क रहावे. या आदेशामध्ये काही तफावत /त्रुटी असल्याची संबंधित कर्मचाऱ्याची तक्रार असल्यास अशी तक्रार त्यांच्याकडून लेखी स्वरुपात घ्यावी आणि आपल्या कार्यालयाच्या अभिप्रायासहित दुरुस्तीचा प्रस्ताव या आदेशाच्या दिनांकापासून तीन महिन्याच्या आत शासनाकडे पाठविला जाईल याची दक्षता घ्यावी. दुरुस्ती प्रस्ताव

पाठवितांना संबंधित कर्मचाऱ्यांच्या नेमणुकांच्या आदेशांच्या प्रती, हजेरी पटाच्या प्रती, आणि सेवापट पाठविण्याची खबरदारी घ्यावी.

४. श्री. दादा महादेव जाधव यांना मजूर पदावर ज्या दिनांकापासून रुपांतरीत अस्थायी आस्थापनेवर आणले त्या दिनांकापासून ते त्यांना सेवेत घेतल्याच्या दिनांकापर्यंत म्हणजेच दि ३०.४.०७ पर्यंतची देय होणारे वेतन व भत्ते फरकाची रक्कम १००% स्वखुशीने सोडून देण्यास तयार असल्याचे हमी पत्र त्यांनी दिले आहे. त्यामुळे त्यांना सदरहू कालावधीतील वेतनाच्या फरकाची रक्कम अनुज्ञेय होणार नाही. मात्र श्री. जाधव यांना प्रत्यक्ष कामावर घेतल्यानंतरच्या कालावधीतील म्हणजे दि १.५.०७ ते अद्यापर्यंतचे अनुज्ञेय असणारी रक्कम अदा करण्यात यावी . तसेच सदर रकमेवर कोणतेही व्याज अनुज्ञेय राहणार नाही. श्री. जाधव यांची वेतन निश्चीती दि. ८.११.८९ पासून करण्यात यावी.

५ दि १.५.०७ पासून ते या आदेशाच्या दिनांकापर्यंतच्या वेतनाच्या फरकाची रक्कम सबंधीत कर्मचाऱ्यांच्या भविष्य निर्वाह निधीत जमा करावयाची असून ती धनादेशाद्वारे (Cheque) अदा करावयाची आहे.

६. या आदेशान्वये रुपांतरीत करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यावर वेतनापोटी होणारा खर्च सन २०११ ते २०१२ या आर्थिक वर्षात संबंधित लेखाशिर्षाखाली मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व पुढील वर्षापासून हप्त्याने द्यावयाच्या रकमेची तरतूद त्या त्या वर्षीच्या अर्थसंकल्पात करावी.

७. हे आदेश शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र. रुअआ १५९६/२२८/सेवा-५, दि. २४ एप्रिल २००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन काढण्यात येत आहेत.

८. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सांकेतांक कमांक :२०११०४२७११४२२२००१ अन्वये प्रसिध्द करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत: प्रपत्र-ब.

**( अ. अ. कोदे )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत अग्रेषित :-**

वित्त विभाग (व्यय १२), मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य १, मुंबई , महाराष्ट्र - २ नागपूर
महालेखापाल, लेखा परिक्षा , महाराष्ट्र -१,मुंबई, महाराष्ट्र-२ नागपूर
अधिक्षक अभियंता, सातारा पाटबंधारे प्रकल्प मंडळ, सातारा.
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, सातारा
आस्थापना(कामगार) संग्रहार्थ.